GR-200407071302020001-0100

सुशिक्षित बेरोजगारांना आर्थिक सहाय्य योजनेअंतर्गत पदवीधर/पदविकाधारक बेरोजगार लाभार्थींना शासकीय सेवेतील गट "क" मधील पदांवर नियुक्तीसाठी सवलती देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक-पअंक-1097/1793/प्र.क्र.4/98/16-अ,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक:- 19 मार्च, 1998.

वाचा:- 1) शा.नि.,उ.ऊ.व का.वि. क्रमांक-ईएमपी-1478/3493/आयएनडी-13, दि.30.11.1978.
2) शा.नि.,सा.प्र.वि. क्रमांक: एईएम-1092/3655/सीआर-90/92/16-अ, दि.31.5.1993.
3) शा.नि.,उ.व तं.शि.आणि सेवायोजन वि. क्रमांक-पीटीई-1091/(406)/सेयो-1, दि.21.3.1995.

निर्णय:-जे पदवीधर/पदविकाधारक नोकरीच्या शोधात आहेत त्यांना मानधन रुपाने सहाय्य देण्याची योजना शासन निर्णय, उ.ऊ. व का.वि.क्रमांक-इएमपी-1448/3493/आयएनडी-13, दि.30.11.78 अन्वये कार्यान्वित आहे. या योजनेअंतर्गत बेरोजगार पदवीधर/पदविकाधारकास प्रत्येक महिन्यास मानधन दिले जाते आणि त्याला प्रत्येक महिन्यात कमीत कमी 15 दिवस रोजी 4 तास याप्रमाणे काम करावे लागते. हे मानधन जास्तीत जास्त 3 वर्षापर्यन्त किंवा त्यास नोकरी मिळेपर्यन्त जे आधी घडेल त्याप्रमाणे अनुज्ञेय राहील.

2. या योजनेचे लाभार्थींनी शासनाकडे त्यांना येणा-या विविध अडचणीसंबंधी गा-हाणी आणि निवेदने सादर केलेली आहेत. त्यांच्या मागण्यांपैकी एक मुख्य म्हणजे शासनातील सेवा प्रवेशासाठी वयोमर्यादा शिथिल करणे तसेच त्यांच्या नियुक्तीसाठी प्राधान्य देणे. शासनाने याबद्दल विचार करुन खालीलप्रमाणे सवलती देण्याचा निर्णय घेतला आहे:-

**अ) कमाल वयोमर्यादेत सवलती :** पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन कर्मचा-यांना शासकीय सेवेतील गट "क" मधील पदावरील नियुक्तीसाठी मागासवर्गीयांच्या बाबतीत 35 वर्षे व मागासवर्गीयाखेरीज इतरांच्या बाबतीत 30 वर्षे अधिक त्यांनी अंशकालीन कर्मचारी म्हणून केलेल्या सेवेचा सलग कालावधी एवढी सूट देण्यात यावी. ही सूट कमाल 3 वर्षे इतकी राहील.

**ब) पसंतीक्रम :** पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन कर्मचा-यांना गट "क" मधील शासकीय सेवेतील पदावर नियुक्तीसाठी शासन निर्णय, सा.प्र.वि.क्रमांक-एईएम-1092/3655/सीआर-90/92/16-अ, दि. 31.5.1993 अन्वये विहित केल्याप्रमाणे पसंतीक्रम देण्यात यावा. हा पसंतीक्रम सन 1991 च्या कार्यमुक्त जनगणना कर्मचारी यांच्या नंतरच राहील.

**क) गुणात सवलत :** संदर पदासाठी निवड मंडळामार्फत घेतल्या जाणा-या स्पर्धा परिक्षेत त्यांनी अंशकालीन काम केलेल्या प्रत्येक वर्षासाठी 2% अधिक गुण देण्यात यावेत. हा कालावधी योजनेअंतर्गत 6 महिन्यापेक्षा कमी असल्यास तो विचारात घेतला जाणार नाही. मात्र, कुठल्याही परिस्थितीत अधिक गुण कमाल 5% च्या वर असणार नाहीत.

3. हे आदेश यापुढील परीक्षांसाठी लागू होतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

नवीन कुमार,
प्रधान सचिव (सेवा).

प्रति,

1. राज्यपालांचे सचिव,
2. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,

(कृ.मा.प.

एच-1534(5000-3-98)

3. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
4. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
5. सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
* 6. सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
* 7. प्रोथोनटरी ॲन्ड सिनियर मास्टर हायकोर्ट, मुंबई,
* 8. प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (मूळ शाखा),
* 9. प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, औरंगाबाद,
* 10. प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई/खंडपीठ, औरंगाबाद, नागपूर,
* 11. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* 12. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
* 13. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
14. अध्यक्ष, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई,
15. सदस्य सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
16. महालेखापाल, महाराष्ट्र-1, मुंबई,
17. महालेखापाल, महाराष्ट्र-2, नागपूर,
18. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
19. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
20. सर्व विभागीय आयुक्त,
21. सर्व जिल्हाधिकारी,
22. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
23. सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी,
24. संचालक, सेवायोजन, मुंबई,
25. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (आवश्यक प्रसिध्दी देण्यासाठी),
26. मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालयप्रमुख,
27. वित्त विभाग,
28. रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
29. सर्व मंत्रालयीन विभाग,
30. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.

---------

* पत्राने.

------